**मागासवर्गीयांचा अनुशेष भरला जाण्याच्या दृष्टीने दिनांक १४.४.२०११ पासून विशेष मोहीम राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.८६/२०११/१६-ब
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ एप्रिल, २०११

**वाचा :** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः असंक १०१०/ प्र.क्र.१/२०१०/ वित्तीय सुधारणा-१, दिनांक ५.६.२०१०.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकःपदनि २०१०/प्र.क्र. ८३/२०१०/ वित्तीय सुधारणा-१, दिनांक २९.११.२०१०.

**प्रस्तावना** :- राज्यातील शासकीय कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्यात आल्यामुळे राज्य शासनाच्या महसूली उत्पन्नाच्या तुलनेत प्रशासकीय खर्चात मोठी वाढ झाली आहे, शासनाच्या तिजोरीवर मोठा ताण आलेला आहे, व परिणामी ताण कमी करण्याच्या अनुषंगाने शासकीय खर्चावर नियंत्रण ठेवण्याची उपाययोजना म्हणून शासकीय विभाग/कार्यालये, शासन अनुदानित संस्था इत्यादीमधील गट-क व गट-ड संवर्गातील (म्हणजे ज्या पदाच्या वेतनश्रेणीतील कमाल वेतन पाचव्या वेतन आयोगानुसार रु. ९०००/- पेक्षा कमी आहे व सहाव्या वेतन आयोगानुसार ग्रेड पे रु.४३००/- किंवा त्यापेक्षा कमी आहे, अशी पदे) पदभरतीस दिनांक ५.६.२०१० पासून एक वर्षाच्या कालावधीसाठी उपरोक्त क्रमांक १ येथे नमूद केलेल्या वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार निर्बंध घालण्यात आले आहेत. सदर निर्बंधामधून काही पदे वगळण्यात आलेली आहेत. उपरोक्त क्रमांक २ येथे नमूद केलेल्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये विशिष्ट प्रकरणी निर्बंधातून सूट देण्याबाबतच्या सूचना देण्यात आल्या आहेत, तसेच जेथे गट-क व गट-ड संवर्गातील पदे भरण्याची तातडीची गरज आहे, अशाबाबतीत विशेष बाब म्हणून निर्बंधातून सूट देण्याच्या प्रस्तावावर निर्णय घेण्यासाठी समिती स्थापन करण्यात आली आहे. समितीच्या मान्यतेने निर्बंधातून सूट मिळाल्यानंतर पदभरती लगेचच करता यावी यादृष्टीने क व ड संवर्गातील मागासवर्गीयांचा अनुशेष भरण्यासाठी मोहीम सुरु करण्याबाबत

तसेच गट-अ व गट-ब संवर्गातील पदांमधील मागासवर्गीयांचा अनुशेष भरण्यासाठी मोहीम सुरु करण्याबाबत सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक १४.४.२०११ पासून मागासवर्गीयांचा अनुशेष भरण्याच्या दृष्टीने :-

१) गट-अ व गट-ब संवर्गातील पदांमधील मागासवर्गीयांचा अनुशेष भरण्याची विशेष मोहीम सुरु करण्यात यावी.

२) गट-क व गट-ड संवर्गातील पदांमधील मागासवर्गीयांचा अनुशेष भरण्याची पदभरतीची प्रक्रिया सुरु करण्याकरिता वित्त विभागाच्या दिनांक २९.११.२०१० च्या शासन निर्णयाच्या अधीन राहून विशेष मोहीम सुरु करण्यात यावी.

सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या सर्व अधिनस्त कार्यालयांच्या निदर्शनास सदर शासन निर्णय आणून द्यावा.

सदरहू शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०४१३२००८०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( के. पी. बक्षी )**
**प्रधान सचिव (सेवा)**

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व परीक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
निवड नस्ती, कार्यासन १६-ब.